**नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या परिक्षेत्रात अधिसुचित विशिष्ट नागरी सेवा व सुविधा पुरविण्यासाठी निधी उपलब्ध करून देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-२०२४/प्र.क्र.५८/का.१४११,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १९ ऑगस्ट, २०२४

वाचा :- १) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३३/का-१४११, दि.२८ मार्च, २०२२,
२) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३६/का-१४११, दि.२९ मार्च, २०२२,
३) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३६/का-१४११, दि.७ जुलै, २०२२,
४) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.५९/का-१४११, दि.२२ नोव्हेंबर, २०२३.

**प्रस्तावना :-**

नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या परिक्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे करण्यासाठी “महानगरपालिका क्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे” व “नगरपालिका/नगरपरिषद/नगरपंचायत क्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे” या योजनेला वाचा येथील अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली असून त्याअंतर्गत करावयाच्या कामांसाठी मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. वाचा येथे नमूद अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयामधील परिच्छेद क्र. (२.४), ३, ४ व ७ येथील तरतुदींमध्ये वाचा येथे नमूद अनुक्रमांक (३) येथील शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली होती. तथापि, वाचा येथे नमूद अनुक्रमांक (३) येथील शासन निर्णयान्वये करण्यात आलेल्या सुधारणा रद्द करुन वाचा येथे नमूद अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयामधील तरतूदी वाचा येथे नमूद अनुक्रमांक (४) येथील शासन निर्णयान्वये पुन:स्थापित करण्यात आल्या आहेत. वाचा येथे नमूद अनुक्रमांक (४) येथील शासन निर्णयातील तरतुदी विचारात घेऊन सोबत जोडलेल्या यादीतील विकास कामांना शासन मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या परिक्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे करणे (महानगरपालिका)" या योजनेअंतर्गत शासन निर्णय, नियोजन विभाग दिनांक २८ मार्च, २०२२ मधील परिच्छेद ३ (ब) नुसार बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रातील सोबत दिलेल्या परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या रू. १०.०० कोटी एवढ्या किंमतीच्या विकास कामांची थेट शासन स्तरावरून निवड करण्यात आली आहे. सदर कामांसाठी कार्यान्वयीन यंत्रणा महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण (म्हाडा), मुंबई राहील.

२. शासन निर्णय, नियोजन विभाग दिनांक २८ मार्च, २०२२ मधील परिच्छेद ३ (ब) नुसार उपरोक्त कामांना संबंधित कार्यान्वयीन यंत्रणा यांनी तांत्रिक मान्यता व जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांनी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची कार्यवाही करावी. प्रशासकीय मान्यता परिशिष्टातील रकमेच्या मर्यादेत असल्याची दक्षता जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांनी घ्यावी.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या कामांसाठी जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर / बृहन्मुंबई महानगरपालिका यांनी संदर्भ क्र. (१) व (४) येथील शासन निर्णयामधील अन्य सर्व अटी व शर्तींचे पालन करणे बंधनकारक राहील. नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाच्या (महानगरपालिका) परिक्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे करणे या योजनेअंतर्गत करावयाच्या विकास कामांसाठी निधी आहरित करुन संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेस संवितरीत करण्यासाठी जिल्हा नियोजन अधिकारी, मुंबई उपनगर हे नियंत्रक अधिकारी व सहाय्यक जिल्हा नियोजन अधिकारी, मुंबई उपनगर हे आहरण व संवितरण अधिकारी राहतील.

४. या कामांसाठी होणारा खर्च हा "मागणी क्र.ओ-९, ३६०४, स्थानिक संस्था व पंचायतराज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकीत रकमा देणे, २००, इतर संकीर्ण नुकसान भरपाई व अभिहस्तांकन, (०१)(०१), नागरी स्थानिक संस्थांना (महानगरपालिका) सहायक अनुदान (३६०४ १००९) (कार्यक्रम), ३१, सहायक अनुदान" या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ करिता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८१९१२२००३०११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHARUSHILA
DEVENDRA CHAUDHARI

Digitally signed by CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT,
2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A75E4CF904B78F2AE051843EA1BA6106A393C2B0CF60FE03C945913B2BAE935F, cn=CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
Date: 2024.08.19 12:35:01 +05'30'

**(चारुशीला चौधरी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, कोकण विभाग,
२. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर,
३. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई,
४. जिल्हा नियोजन अधिकारी, मुंबई उपनगर,
५. मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) महोदयांचे उप सचिव,
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
७. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई उपनगर,
९. वित्त विभाग, व्यय-८/कोषा प्रशासन-५/अर्थसंकल्प-१६, मंत्रालय, मुंबई,
१०. निवड नस्ती (का-१४११), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

## परिशिष्ट

| **शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण-२०२४/प्र.क्र.५८/का.१४११, दि. १९ ऑगस्ट, २०२४ सोबतचे परिशिष्ट** | | |
|---|---|---|
| **अ.क्र.** | **विकासकामाचे नाव** | **रक्कम (लक्ष)** |
| १ | शिवाजीनगर, गोवंडी प्रभाग क्रमांक १३९ जाफरी येथील इंग्लिश हायस्कूल आणि कनिष्ठ महाविद्यालय परिसरातील प्लॉट क्रमांक २९A, गजानन कॉलनी येथे विविध नागरी दुरुस्ती आणि आसपासच्या पॅसेजची सुधारणा | २०.०० |
| २ | उर्दू हायस्कूल आणि ज्युनियर कॉलेज परिसरातील प्लॉट क्रमांक २५/२६, रोड क्रमांक १, शिवाजी नगर, गोवंडी, प्रभाग क्रमांक १३८, नूरुल इस्लाम येथे विविध नागरी दुरुस्ती आणि आसपासच्या पॅसेजची सुधारणा. | २०.०० |
| ३ | प्लॉट क्र. ८, लोटस कॉलनी, दुर्गा सेवा संघ, गोवंडी, प्रभाग क्रमांक १३९, जोहर उर्दू हायस्कूल परिसरातील विविध नागरी दुरुस्ती आणि आसपासच्या पॅसेजची सुधारणा. | २०.०० |
| ४ | गीता विद्यालय परिसरातील विविध नागरी दुरुस्ती आणि आसपासच्या पॅसेजची सुधारणा, प्लॉट क्र ४८ येथील रोड क्र. ४, शिवाजी नगर, गोवंडी, प्रभाग क्रमांक १३८ | २०.०० |
| ५ | पीएल लोखंडे मार्गावरील अंजुमन रियाझुल इस्लाम उर्दू हायस्कूल परिसरातील विविध नागरी दुरुस्ती आणि आसपासच्या पॅसेजची सुधारणा, गौतम नगर, प्रभाग क्रमांक १४०. | २०.०० |
| ६ | भारत नगर उर्दू शाळा, रोड क्र. १३, बैगनवाडी येथे विविध नागरी दुरुस्ती आणि आसपासच्या पॅसेजची सुधारणा, प्रभाग क्रमांक १३४. | २०.०० |
| ७ | रुबी इंग्लिश हायस्कूल परिसरातील विविध नागरी दुरुस्ती आणि आसपासच्या पॅसेजची सुधारणा, रोड क्र. १३, बैगनवाडी, प्रभाग क्रमांक १३४. | २०.०० |
| ८ | सिटिझन हायस्कूल परिसरातील विविध नागरी दुरुस्ती आणि आसपासच्या पॅसेजची सुधारणा, प्लॉट क्रमांक २५, रोड क्र. १२, बैगनवाडी, प्रभाग क्रमांक १३६. | २०.०० |
| ९ | अलमेंदी उर्दू शाळेच्या परिसरातील विविध नागरी दुरुस्ती आणि आसपासच्या पॅसेजची सुधारणा, प्लॉट क्र. २५, रोड क्र. १२, बैगनवाडी, प्रभाग क्रमांक १३६. | २०.०० |
| १० | ज्ञान साधना मराठी शाळेच्या परिसरातील विविध नागरी दुरुस्ती व आसपासच्या पॅसेजची सुधारणा, रोड क्र. ११, आदर्श नगर, प्रभाग क्रमांक १३६. | २०.०० |
| ११ | बेहरूल उलूम उर्दू हायस्कूल परिसरातील विविध नागरी दुरुस्ती आणि आसपासच्या पॅसेजची सुधारणा, कमला रमण नगर, प्रभाग क्रमांक १३६. | २०.०० |
| १२ | स्वातंत्र्यवीर सावरकर हिंदू विद्यालय परिसरातील विविध नागरी दुरुस्ती आणि आसपासच्या पॅसेजची सुधारणा, प्लॉट क्रमांक ४४, शिवाजी नगर, प्रभाग क्रमांक १३८. | २०.०० |
| १३ | अल कौसर उर्दू हायस्कूल परिसरातील विविध नागरी दुरुस्ती आणि आसपासच्या पॅसेजची सुधारणा, भूखंड क्र. २६, रस्ता क्र. २, शिवाजी नगर, प्रभाग क्रमांक १३८. | २०.०० |
| १४ | बैत उल नसीब उर्दू कन्या शाळा परिसर येथे विविध नागरी दुरुस्ती आणि आसपासच्या रस्ता सुधारणे, रोड क्र. २, शिवाजी नगर, प्रभाग क्रमांक १३८. | २०.०० |

| | | |
|---|---|---|
| १५ | अंजुमन इनायतुल इस्लाम उर्दू हायस्कूल परिसरातील विविध नागरी दुरुस्ती आणि आसपासच्या पॅसेजची सुधारणा, प्लॉट क्र. ४३, रोड क्र. ५, शिवाजी नगर, प्रभाग क्र.१३८ | २०.०० |
| १६ | प्रभाग क्रमांक १३८, १३६ व १३७ मधील शिवाजी नगर व बैंगनवाडी येथील विविध शाळांना संगणक पुरवठा. | ५०.०० |
| १७ | मानखुर्द व गायकवाड नगर येथील विविध शाळांना संगणक पुरवठा, प्रभाग क्र .१३५ आणि प्रभाग क्र. १३९. | ५०.०० |
| १८ | रफी नगर मधील सुन्नी मुस्लिम कब्रस्तान मध्ये पथवे वर शेड बांधणे आणि विविध विद्युत कामे, गोवंडी, प्रभाग क्रमांक १३४. | ५०.०० |
| १९ | रफी नगर गोवंडी येथील शिया मुस्लीम कब्रस्तान येथे मार्गावर शेडचे बांधकाम, प्रभाग क्रमांक १३४ | २५.०० |
| २० | शिवाजी नगर येथील अहिल्याबाई होळकर मार्गावर दुभाजकाच्या बाजूला M.S रेलिंग बसवणे, गोवंडी प्रभाग क्र. १३८ | ५०.०० |
| २१ | प्रभाग क्र. १३४ मध्ये विविध ठिकाणी M.S ओपन शेड बनवणे आणि बांधकाम करणे. | ४०.०० |
| २२ | प्रभाग क्र. १३५ मध्ये विविध ठिकाणी M.S. ओपन शेड बनवणे व बांधकाम करणे. | ५०.०० |
| २३ | प्रभाग क्र. १३६ मधील विविध ठिकाणी M.S. ओपन शेड बनवणे व बांधकाम करणे. | ५०.०० |
| २४ | प्रभाग क्र. १३७ मध्ये विविध ठिकाणी M.S ओपन शेड बनवणे व बांधकाम करणे. | ४०.०० |
| २५ | प्रभाग क्र. १३८ मध्ये विविध ठिकाणी M.S ओपन शेड बनवणे व बांधकाम करणे. | ४०.०० |
| २६ | प्रभाग क्र. १३९ मध्ये विविध ठिकाणी M.S ओपन शेड बनवणे व बांधकाम करणे. | ४०.०० |
| २७ | प्रभाग क्र. १४० मध्ये विविध ठिकाणी M.S ओपन शेड बनवणे व बांधकाम करणे. | ४०.०० |
| २८ | रस्ता क्रमांक १-४, शिवाजी नगर येथील विविध ठिकाणच्या पॅसेज व ड्रेनेजची सुधारणा, गोवंडी, प्रभाग क्रमांक १३८. | २५.०० |
| २९ | संजय नगर भाग II, ९० फूट रोड येथील विविध ठिकाणच्या पॅसेज व ड्रेनेजची सुधारणा, गोवंडी, प्रभाग क्रमांक १३४. | २५.०० |
| ३० | पद्मा नगर, रस्ता क्र. १४, गोवंडी येथील विविध ठिकाणच्या रस्ता व ड्रेनेजची सुधारणा, प्रभाग क्रमांक १३४. | २५.०० |
| ३१ | कमला रमण नगर येथील विविध ठिकाणच्या पॅसेज व ड्रेनेजची सुधारणा, बैगनवाडी, गोवंडी, प्रभाग क्रमांक १३६. | २५.०० |
| ३२ | गायकवाड नगर, पी.एल.लोखंडे मार्गावरील विविध ठिकाणच्या पॅसेज व ड्रेनेजची सुधारणा, प्रभाग क्रमांक १३९. | २५.०० |
| ३३ | रस्ता क्र. ७-१०, बैगनवाडी येथील विविध ठिकाणच्या पॅसेज व ड्रेनेजची सुधारणा, गोवंडी, प्रभाग क्रमांक १३७. | २५.०० |
| ३४ | मंडाळा येथील विविध ठिकाणच्या पॅसेज व ड्रेनेजची सुधारणा, प्रभाग क्रमांक १३५. | २५.०० |
| | **एकूण (लक्ष)** | **१०००.००** |

*****